**राज्य योजना सन २०१४-१५**

गोरेगांव, आरे कॉलनी, मुंबई येथे आंतरराष्ट्रीय स्तरावरचे प्राणी संग्रहालय स्थापन करणे.

**महाराष्ट्र शासन**

महसूल व वन विभाग,

शासन निर्णय क्र. डब्ल्यूएलपी-०६.१४/प्र.क्र.१२६/फ-१

मंत्रालय, मुंबई ४०००३२.

दिनांक :- १३ फेब्रुवारी, २०१५.

**वाचा :-**

१. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र. कक्ष-१/पी/यो/चाबाप्र/प्र.क्र.४३/(१४-१५)/४२० दिनांक १२.०६.२०१४.

२. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), पश्चिम, मुंबई यांचे पत्र क्र. कक्ष-२/योजना/ रायो/ प्र.क्र.४(४)/५८०/सन २०१४-१५, दिनांक ११.११.२०१४.

३. वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक अंदाज-२०१३/प्र.क्र.८५/अर्थसंकल्प-३, दिनांक ०२.०१.२०१५ व दिनांक ०९.०२.२०१५.

४. शासन निर्णय समक्रमांक २३.०१.२०१५.

**प्रस्तावना :-**

वार्षिक योजना सन २०१४-१५ राज्य योजनेअंतर्गत गोरेगांव, आरे कॉलनी, मुंबई येथे आंतरराष्ट्रीय स्तरावरचे प्राणी संग्रहालय स्थापन करणे याकरीता रुपये १००.०० लक्ष मंजूर नियतव्यय अर्थसंकल्पीत करण्यात आला आहे. त्यानुसार गोरेगांव, आरे कॉलनी, मुंबई येथे आंतरराष्ट्रीय स्तरावरचे प्राणी संग्रहालय स्थापन करण्यासाठी (२४०६ ८२०१) करणेकरिता आरे दुग्ध विभागाकडून वन विभागास हस्तांतरण होणाऱ्या एकूण १९०.०० एकर क्षेत्राच्या एकूण ४६०५ मी. परिघीय लांबीपैकी ६२५ मी. परिघीय लांबीवर सलोह कॉक्रीट भिंत बांधणे (मी. @ रु. १२,०००/- प्रति मी. प्रमाणे) आवश्यक असलेल्या रु. ७५.०० लक्ष व गोरेगांव, आरे कॉलनी, मुंबई येथे प्राणीसंग्रहालय स्थापन करणेकामी विभागामार्फत सल्लागार Consultancy नेमण्याची आवश्यकता नसल्याने सदरची रक्कम रु. २५.०० लक्ष सलोह कॉक्रीट भिंत बांधणेसाठी खर्च करणे असे रु. १००.०० लक्षचा प्रस्ताव संदर्भ क्रमांक १ व २ च्या पत्रान्वये शासनास प्रस्ताव सादर केला आहे. वित्तविभाग दिनांक ०२.०१.२०१५ च्या परिपत्रकानुसार अर्थसंकल्पित तरतूदीच्या ६०% मर्यादेत वितरीत करण्याचे आदेश आहेत. त्या अनुषंगाने सन २०१४-१५ मध्ये विहीत प्रयोजनाखाली अर्थसंकल्पित निधीच्या अधीन राहून रुपये ६०.०० लक्ष निधी खर्च करण्यास संदर्भ क्रमांक ४ च्या शासन निर्णयान्वये मान्यता प्रदान करण्यात आली आहे.

२. आता वित्तविभाग दिनांक ०९.०२.२०१५ च्या परिपत्रकानुसार सन २०१४-१५ मध्ये योजनांतर्गत अर्थसंकल्पित निधीपैकी ७५% निधी खर्च करण्याचे अधिकार संबधित विभागास प्रदान करण्यात आलेले आहेत. गोरेगांव, आरे कॉलनी, मुंबई येथे आंतरराष्ट्रीय स्तरावरचे प्राणी संग्रहालय स्थापन करणे या योजनेसाठी वित्त विभागाच्या दिनांक ०९.०२.२०१५ च्या परिपत्रकानुसार उर्वरित रु.१५.०० लक्ष निधी खर्च करण्यास खालील अटींवर शासनाची मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

१. सदर योजनेवर खर्ची टाकावयाची रक्कम सन २०१४-१५ मध्ये लेखाशिर्ष क्रमांक २४०६ वनीकरण व वन्यजीवन, उपशीर्ष ०२ पर्यावरणीय वनीकरण, व वन्यजीवन, ११० वन्यजीवांचे जतन योजना (००) (१७) गोरेगांव येथे आंतरराष्ट्रीय स्तराचे प्राणी संग्रहालय स्थापनकरणे (आरे कॉलनी), मुंबई (राज्य) (२४०६ ८२०१) अंतर्गत उद्दिष्टनिहाय, अर्थसंकल्प वितरण प्रणालीव्दारे प्राप्त होणाऱ्या निधीतून करण्यात यावा.

२. योजनांतर्गत प्रस्तावीत कार्यबाबींना आवश्यकतेनुसार सक्षम प्राधिकाऱ्यांनी प्रशासकीय व तांत्रिक मान्यता प्रदान केलेली आहे याची खातरजमा झाल्यानंतरच सदर कार्यबाबींवर निधी खर्ची टाकण्यात यावा.

३. वितरीत केलेला निधी शासनाने दिलेल्या मान्यतेनुसार योजनेस विहीत केलेल्या मर्यादेत, प्रचलित नियमांच्या अधीन राहून, प्रचलित धोरण व वित्त विभागाने वेळोवेळी विहीत केलेल्या मार्गदर्शक तत्त्वानुसार तसेच प्रस्तावात नमूद केलेल्या कार्यबाबींच्या अनुषंगाने खर्च करण्यात यावा.

४. प्रस्तावित असलेल्या मोठया बांधकामासाठी शासनाने दिलेल्या सूचना आणि विहीत केलेली कार्यपद्धती अनुसरण्याची संबंधीत नियंत्रक/अंमलबजावणी अधिकारी यांची राहील. कोणत्याही प्रकारची वित्तीय अनियमितता होऊ न देण्याचीही जबाबदारी त्यांची असेल.

सदरचा शासन निर्णय वित्त विभागाचे परिपत्रक क्र. अंदाज-२०१३/प्र.क्र.८५/ अर्थसंकल्प-३, दिनांक ०९.०२.२०१५ अनुलक्षून निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०२१३१३२१४८९५१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

APTE ARVIND SHANKAR

Digitally signed by APTE ARVIND SHANKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WOMEN AND CHILD DEVELOPMENT,CID - 918010, postalCode=400032, st=Maharashtra, cn=APTE ARVIND SHANKAR
Date: 2015.02.13 13:59:54 +05'30'

**(अरविंद आपटे)**
विशेष कार्य अधिकारी,
महसूल व वन विभाग

**प्रति,**

१) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर
२) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर
३) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर

४) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव) पश्चिम, मुंबई,
५) मुख्य वनसंरक्षक व संचालक, संजय गांधी राष्ट्रीय उद्यान, बोरीवली.
६) महालेखापाल१/२ (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखापरिक्षण), मुंबई/नागपूर
७) प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
८) कक्ष अधिकारी, (व्यय-१०), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
९) ब-१, फ-२,फ-१ कार्यासन (निवडनस्ती), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

*********************

शासन निर्णय क्र. डब्ल्यूएलपी-०६.१४/प्र.क्र.१२६ /फ-१, दिनांक:-१३.०२.२०१५ सोबतचे मासिक निधी विवरण पत्र.

(रक्कम रु. लाखात)

| अ.क्र. | लेखाशिर्ष २४०६-८२०१ | अर्थसंकल्पित निधी | फेब्रुवारी, २०१५ | मार्च | एकूण |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ५ | ६ | ७ |
| १ | ५०-इतर खर्च | १००.०० | १५.०० | ००.०० | १५.०० |

****